मौजे आव्हा युनुसपूर,ता,मोताळा,जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रमा २११४/प्र.क्र.१६७/पापु १३**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीखः ०६ ऑगस्ट,२०१४**

**वाचा -**

१) शासन निर्णय क्र.ग्रापापु-२११४/प्र.क्र.४४/पापु-१३,दि.०६मे,२०१४
२) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलडाणा यांचे पत्र क्र.बुजिप/पापुयो/४६०/२०१४ दि.२०/०६/२०१४

**प्रस्तावना -**

**मौजे आव्हा युनुसपूर,ता,मोताळा जि.बुलडाणा** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१२१.५०लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तथापी योजनेसाठीच्या बोलविण्यात आलेल्या निविदा ज्यादा दराने प्राप्त झाल्याने योजनेच्या खर्चात वाढ झाली. त्यामुळे मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलडाणा यांच्यांकडून संदर्भाधिन पत्र क्र.३ अन्वये प्राप्त झालेल्या **मौजे आव्हा युनुसपूर,ता,मोताळा जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा** योजनेच्या सुधारित आराखडयास व अदांजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -**

**मौजे आव्हा युनुसपूर,ता,मोताळा जि.बुलडाणा** या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१३०.५५ लक्ष (एक कोटी तीस लक्ष पंचावन्न हजार फक्त) (ढोबळ) एवढ्या सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास** खालील अटीच्या अधिन राहून सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत योजनेची कामे पूर्ण करावीत. तसेच प्रस्तुत योजनेच्या खर्चात वाढ होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

२. या योजनेस प्रशासकीय मंजुरी दिलेल्या मूळ शासन निर्णयात तसेच तांत्रिक मान्यतेच्या आदेशात नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद,बुलडाणा यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतीचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी ,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल अशी बघण्याची जबाबदारी संबधित जिल्हा परिषदेची राहील. योजना स्वंयनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणीपट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहिल.

६. सदर योजना विहित कालावधीत पूर्ण करण्यात यावी.

७. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील.

**८. योजना काणेत्याही परिस्थितीत पुर्नसुधारीत करण्यात येऊ नये.**

२. या योजनेवरील सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.९,०४,५००/- (रु.नऊ लक्ष चार हजार पाचशे फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन मंडळाकडून जिल्हा परिषदेस उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

३. प्रस्तुत योजनेस सुधारीत प्रशासकीय मान्यता ही वित्त विभागाच्या दि.१५/०५/२००९ रोजीच्या क्र. विअप्र-१०.०८/ प्र.क्र. ७०/ २००८/ विनियम या शासन निर्णयातील भाग पहिला, उपविभाग-३ मधील

अ.क्र.६ (सहा) परिच्छेद क्र.२७(अ) अनुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार देण्यात येत आहे..

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०६१०३१५६२२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMBEKAR SURESH D

Digitally signed by AMBEKAR SURESH D
DN: CN = AMBEKAR SURESH D, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.08.06 14:29:49 +05'30'

**( सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई-२१
५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण , नागरी व ग्रामीण योजना मंडळ, ठाणे
६) जिल्हाधिकारी, बुलडाणा.
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा
८) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अकोला
९) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती
१०) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलडाणा.
११) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
१२) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
१३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ना.व ग्रा.योजना विभाग,बुलडाणा
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा.
१५) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग. यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई.
१७) सर्व कार्यासने, पा. पु. व स्व. वि.मंत्रालय,मुंबई-३२.
१८) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.